**सन २०१८-१९ पासून राज्याचे वस्त्रोद्योग धोरण सन २०१८-२३ अंतर्गत राज्यातील अपारंपारीक तंतू उत्पादन व वापरासाठी विशेष प्रोत्साहन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रावियो-१०१८/प्र.क्र.९५/रेशीम कक्ष**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगूरु चौक

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक: २० ऑगस्ट, २०१८

वाचा-

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३, दि. १५ फेब्रू., २०१८

प्रस्तावना-

राज्याचे वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ हे शासन निर्णय १५.२.२०१८ अन्वये जाहीर करण्यात आले आहे. राज्यात उत्पादित होणाऱ्या कापूस, रेशीम, लोकर, अन्य अपारंपारीक तंतूवर (बांबू, केळी, मका, अंबाडी, घायपात ,काथ्या इत्यादी. ) व मानव निर्मित तंतूवर प्रक्रिया होवून रोजगार निर्मिती व्हावी या साठी राज्याचे नविन वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ जाहीर करण्यात आले आहे.

महाराष्ट्रामध्ये मोठ्या प्रमाणात बांबू, केळी, अंबाडी, घायपात, नारळ यांचे उत्पादन घेतले जाते. अशा अपारंपारीक गोष्टींपासून तंतूनिर्मीती व त्या तंतूपासून विविध उत्पादन निर्मिती संभव आहे. केळीच्या उत्पादनानंतर केवळ घड सोडून अन्य गोष्टीची विल्हेवाट लावण्यावर खर्च करण्याऐवजी त्यावर प्रक्रीया करुन उत्पन्न मिळाल्याने शेतकऱ्यांचे उत्पन्न लगेच वाढेल.

महाराष्ट्राचे नवीन वस्त्रोद्योग धोरण राज्यातील वस्त्रोद्योग क्षेत्राला नव्याने चालना देणारे आहे. यात येत्या ५ वर्षात १० लक्ष रोजगार निर्मिती तसेच सन २०२२ पर्यंत राज्यातील शेतकऱ्यांचे उत्पन्न दुप्पट करण्याचे लक्ष ठेवण्यात आले आहे. त्यानुषंगाने अपारंपारीक तंतु उत्पादन व वापरासाठी विशेष प्रोत्साहन देण्याची योजना राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

१. राज्यातील सर्व घटकापर्यंत अपारंपारीक तंतु उत्पादन व वापरासाठी विशेष प्रोत्साहन देण्याची योजना हाती घेण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यासाठी प्रस्तुत योजनेत खालीलप्रमाणे बाब समाविष्ठ करण्यात येत आहे.

अ. अपारंपारीक तंतु उत्पादन व वापरासाठी विशेष प्रोत्साहन - अपारंपारीक तंतु (बांबू, केळी, मका, अंबाडी, घायपात ,काथ्या इत्यादी. )उत्पादन व त्याचा वापर करण्यासाठी संशोधनावर भर देण्यात येईल. अपारंपारीक तंतु उत्पादन व वापरासाठी प्रोत्साहन देण्यात येईल. तंतू पिकांचे उत्पादन घेण्यासाठी मनरेगा योजनेत या पिकांचा समावेश करण्यात येईल. आवश्यक तेथे सिंचनासाठी शेततळ्याची सुविधा उपलब्ध करुन देण्यात येईल.

२. प्रस्तुत योजनेचा खर्च वस्त्रोद्योग विभागाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत राखून ठेवण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात येईल.

३. सदर योजनेला वरील प्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात आल्यानंतर अर्थसंकल्पीय तरतुदीसाठी नवीन लेखाशीर्ष उघडण्यासाठी नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने प्रस्ताव महालेखापाल यांच्या मान्यतेसाठी पाठविण्यात येईल.

४. उपरोक्त खर्च भागविण्यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून उपसचिव, (रेशीम कक्ष) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२०१७१६०१६३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashish Anaclet Lopes

Digitally signed by Ashish Anaclet Lopes
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing And Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=97c1663938db95bf4b157b5906fb45b17fdf64e8db800c9618de046d6e51497c, serialNumber=4c69f8b7f13f76b97aa93b0d155291c61823c6e1d678a555f6eb04d1a38750cf, cn=Ashish Anaclet Lopes
Date: 2018.08.20 17:18:08 +05'30'

**(आ. अ. लोपिस)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.मंत्री, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.राज्यमंत्री सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. अप्पर मुख्य सचिव, (सहकार) यांचे स्वीय सहायक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग मंत्रालय, मुंबई,
६. अप्पर मुख्य सचिव (पणन) यांचे स्वीय सहायक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग मंत्रालय, मुंबई,
७. सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग मंत्रालय, मुंबई,
८. संचालक (रेशीम) रेशीम संचालनालय नागपूर.
९. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
१०. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२. निवासी व लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई.
१३. उप सचिव (वस्त्रोद्योग-रेशीम), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग मंत्रालय, मुंबई
१४. निवड नस्ती - रेशीम कक्ष